Guidelines of Personal Ledger Account (PLA) opened in Treasury by the name of Executive Director of various Irrigation Development Corporation.

विविध पाटबंधारे विकास महामंडळांचे कार्यकारी संचालक यांचे पदनामे कोषागारात उघडण्यात आलेल्या स्वीय प्रपंजी लेख्यांच्या **(Personal Ledger Account)** कार्यपद्धतीबाबत.

**महाराष्ट्र शासन**

जलसंपदा विभाग

शासन निर्णय क्रमांक : बीजीएम १०.१०/(३९२/२०१०)/अर्थ-१

मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.

दिनांक : २२ डिसेंबर, २०१०

**प्रस्तावना** :- विविध पाटबंधारे विकास महामंडळांना शासनाकडुन शासन अंशदान स्वरुपात निधी उपलब्ध करण्यात येतो. अर्थसंकल्पीय तरतुदीनुसार जलसंपदा विभागाकडुन विविध पाटबंधारे विकास महामंडळांस वितरीत होणाऱ्या रकमांचा प्रत्यक्षात वापर होईपर्यंत त्या महामंडळाच्या बँकांच्या खात्यामध्ये शासकीय लेख्यांच्या बाहेर पडुन राहतात. शासनाच्या लेख्याबाहेर मोठ्या प्रमाणात पडुन राहणाऱ्या रकमांचा विचार करता विविध पाटबंधारे विकास महामंडळांच्या नावाने वित्त विभाग शासन निर्णय क्र. संकीर्ण १०.०८/प्रक्र.९९/कोषा-५, दि.१९/०५/२०१० अन्वये संबंधित कोषागारात स्वीय प्रपंजी लेखे (Personal Ledger Account) उघडण्याबाबत सुचना देण्यात आल्या आहेत. विविध पाटबंधारे विकास महामंडळांचे कार्यकारी संचालक यांचे पदनामे कोषागारात उघडण्यात आलेले स्वीय प्रपंजी लेखे कार्यान्वित करण्यास कोणती कार्यपद्धती अवलंबण्यात यावी याबाबतचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. या प्रकरणी शासनाने पुढीलप्रमाणे निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय**:- विविध पाटबंधारे विकास महामंडळांचे कार्यकारी संचालक यांचे पदनामे कोषागारात उघडण्यात आलेले स्वीय प्रपंजी लेखे कार्यान्वित करण्यास खालील कार्यपद्धती अवलंबण्यास अनुमती देण्यात येत आहे.

१) विविध पाटबंधारे विकास महामंडळांचे कार्यकारी संचालक हे संबंधित महामंडळाच्या स्वीय प्रपंजी लेख्याचे प्रशासक राहतील.

२) विविध पाटबंधारे विकास महामंडळांना शासनाकडुन वितरीत होणारा सर्व निधी त्यांनी त्यांचे स्वीय प्रपंजी लेख्यांत (Personal Ledger Account) जमा करावा.

३) शासनाकडुन प्राप्त होणाऱ्या निधी व्यतिरिक्त कोणताही निधी स्वीय प्रपंजी लेख्यांमध्ये जमा करण्यात येऊ नये.

४) स्वीय प्रपंजी लेख्यातुन ज्या कारणासाठी रक्कम काढण्यात येईल, त्याबाबतचा बाबनिहाय तपशील नमुद करण्यात यावा.

५) विविध पाटबंधारे विकास महामंडळांनी अधिदान व लेखाधिकारी/कोषागार कार्यालयांशी त्यांचे जमा, खर्च यासंबंधी ज्ञापनांचा स्वीय प्रपंजी लेख्यांबरोबर मासिक, त्रैमासिक, अर्धवार्षिक व वार्षिक ताळमेळ घालावा.

६) आर्थिक वर्ष संपण्याच्या तारखेस म्हणजेच दि. ३१ मार्च रोजी स्वीय प्रपंजी लेख्यामध्ये शिल्लक असलेली रक्कम ही कोषागार कार्यालयाने काढलेल्या शिल्लक रकमेशी जुळणारी असावी आणि त्याबाबतचे वार्षिक शिल्लक प्रमाणपत्र (Annual Balance Certificate) संबंधित कोषागार कार्यालयांना पाठविण्यात यावे.

७) शासनाकडुन यापुढे महामंडळांना वितरीत होणाऱ्या सर्व रकमा स्वीय प्रपंजी लेख्यामंध्ये जमा होऊन त्यातुन शासनाच्या वेळोवेळीच्या आदेशानुसार व आवश्यकतेनुसार खर्ची पडतील.

८) शासनाच्या आदेशानुसार ज्या प्रयोजनाकरिता स्वीय प्रपंजी लेख्यांतुन रक्कम आहरित केली जाईल, ती तात्काळ त्या प्रयोजनावर खर्ची पडेल, तसेच सदर रक्कम स्वीय प्रपंजी लेख्यांबाहेर पडुन राहणार नाही, याची जबाबदारी व संनियंत्रण कार्यकारी संचालक यांचे राहील.

सदर निर्णय वित्त विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र.२०९/१०/कोषा-प्र-५, दि.२७/१०/२०१० अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

(रा.मो. होळकर)
**शासनाचे अवर सचिव**

प्रत :

मा. राज्यपालांचे सचिव,
मा. मुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. उपमुख्यमंत्री यांचे सचिव,
मा. मंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव,
मा. राज्यमंत्री (जलसंपदा) यांचे खाजगी सचिव,
मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
प्रधान सचिव, नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव(ले व को), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई,
सचिव (जलसंपदा) यांचे स्वीय सहायक,
सचिव (लाक्षेवि) यांचे स्वीय सहायक,
सर्व कार्यकारी संचालक, पाटबंधारे विकास महामंडळ,
महालेखापाल, महाराष्ट्र १/२ (लेखापरीक्षा)/(लेखा अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर,
अधिदान व लेखाधिकारी, मुंबई.
कोषागार अधिकारी, पुणे/नागपूर/जळगाव/औरंगाबाद/ठाणे,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, पुणे,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, नागपुर,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, जळगाव,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, औरंगाबाद,
अधीक्षक अभियंता व प्रशासक, लाभक्षेत्र विकास प्राधीकरण, ठाणे,
उपसचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई,
कार्यासने अर्थ-२/लेखा/निवसं/ल.पा.१/सिं.व्य.(कामे)/खारभूमी,जलसंपदा विभाग,मंत्रालय,मुंबई,
अर्थ-१ कार्यासन संग्रहार्थ.